राज्य योजना सन २०१९-२०२०
**संजय गांधी राष्ट्रीय उद्यानात संरक्षक भिंतीचे बांधकाम (४४०६ ३८४९) निधी वितरीत करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-१०.१९/प्र. क्र.२८६/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०९ ऑक्टोंबर, २०१९.

वाचा :-

१. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०१९.
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८.०७.२०१९
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-२४ / वअं/लेखा/प्रमं/प्र. क्र. २०/४४३/२०१९-२०, नागपूर, दिनांक :- ०७.०८.२०१९.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/यो/चाबाप्र/प्र.क्र.७९/८२२/२०१९-२०, दिनांक :- ०९.०८.२०१९.
५. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०८.१९/प्र. क्र. २४४/फ-१, दिनांक :- ०४.१०.२०१९.

**प्रस्तावना :-**

सन २०१९-२० राज्यस्तरीय योजनेअंतर्गत संजय गांधी राष्ट्रीय उद्यानात संरक्षक भिंतीचे बांधकाम (४४०६ ३८४९) या लेखाशिर्षांतर्गत रुपये ४००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रान्वये संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाकरीता संरक्षण भिंत बांधणेच्या ४ अंजदापत्रकास प्रशासकिय मान्यता मिळण्याबाबतचा प्रस्ताव शासनास मान्यतेसाठी सादर केला होता. सदर प्रस्तावास संदर्भ कमांक ५ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली आहे. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये सन २०१९-२० करीता संजय गांधी राष्ट्रीय उद्यानात संरक्षक भिंतीचे बांधकाम (४४०६ ३८४९) या लेखाशिर्षांतर्गत **रु. ३९८.५७ लक्ष** निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

**शासन निर्णय : -**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये संजय गांधी राष्ट्रीय उद्यानासभोताली संरक्षक भिंतीचे बांधकाम (४४०६ ३८४९) या योजनेंतर्गत सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन संदर्भ क्र. ५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामांकरिता रु. २४०.०० लक्ष निधी खर्च करण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. सदर निधीसाठी नियंत्रण अधिकारी प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांचेकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. त्यांनी या योजनेअंतर्गत घावयाच्या कामांची अंमलबजावणी, कृती आराखड्याप्रामाणे, विहीत कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेलया मुदतील करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सुचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपैक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रण अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

२. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०१९-२० मध्ये लेखाशिर्ष क्रमांक ४४०६, वनीकरण व वन्य जीवन यांवरील भांडवली खर्च ०१, वनीकरण, १०१ वन संर्वधन विकास व वन्यजीवन (००) (०७) संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाकरिता संरक्षक भिंत बांधणेबाबत (राज्य) (४४०६ ३८४९) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

३. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

४. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

५. प्रस्तावित असलेल्या मोठ्या बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधित जबाबदारी नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील. कोणत्याही प्रकारची वित्तीय अनियमितता होऊ न देण्याचीही जबाबदारी त्यांची असेल.

६. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

७. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक - विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ ,दिनांक - १७.०४.२०१५, वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक - अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०१९ व क्रमांक :- अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८.०७.२०१९ च्या शासन निर्णयाचे काटेकोर पालन करावे .

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८.०७.२०१९ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१००९१५२४०४८४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL DESHBHRATAR

Digitally signed by SWAPNIL DESHBHRATAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, postalCode=400037, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=ce420aedd83773a67f861ab4c751835b3c5119f8fc41f2f3aa39bd7749dc02e0, ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL DESHBHRATAR
Date: 2019.10.09 15:30:25 +05'30'

**( स्वप्निल देशभ्रतार )**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई.
५. मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली.
६. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
७. फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.